**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या वर्षात कार्यालयीन इमारतींची देखभाल दुरुस्ती या योजनेंतर्गत आदिवासी विकास भवन, गडकरी चौक, नाशिक या इमारतीच्या दुरुस्तीकरिता व इतर इमारतींच्या दुरुस्ती कामांसाठी निधी वितरण**
**(लेखाशिर्ष २०५९ ४५६७)**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४/ प्र.क्र.०२/ कार्यासन-६**
**मंत्रालय विस्तार, मुंबई**-४०० ०३२
**तारीख :** २९ **मार्च,** २०**२५**.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४, दि.१२.०२.२०२५, व दि.१७.०३.२०२५.
३) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग यांचे पत्र क्र.१४२/२०२५, दि.१७.०३.२०२५.
४) आदिवासी विकास विभाग, शासन ज्ञापन क्र. आकाइ-१४२२/प्र.क्र. १४७/कार्या-५, दि.२८.११.२०२२.
५) आदिवासी विकास विभाग, शासन ज्ञापन क्र. आकाइ-१४२३/प्र.क्र.५५/कार्या-५, दि.१७.०२.२०२३.
६) आदिवासी विकास विभाग नस्ती क्र.आकाइ-१४२४/प्र.क्र. ६३/कार्या-५.

**प्रस्तावना :-**

आदिवासी विकास विभागाच्या अधिनस्त सहआयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती क्र. १ नाशिक या कार्यालयाच्या दुरुस्तीसाठी आणि याच कार्यालयातील पोलीस दक्षता पथक कार्यालयाच्या दुरूस्तीसाठी एकत्रित रु. २६३.५५ लक्ष इतक्या निधीस दिनांक २८ नोव्हेंबर, २०२२ रोजीच्या शासन ज्ञापनान्वये, तसेच आदिवासी विकास भवन, गडकरी चौक, नाशिक या इमारतीच्या दुरुस्तीसाठी रु. ४५०.१३ लक्ष इतक्या अंदाजपत्रकास दि.१७ फेब्रुवारी, २०२३ रोजीच्या शासन ज्ञापनान्वये कार्यालयीन इमारतींची देखभाल दुरुस्ती योजनेंतर्गत (लेखाशिर्ष २०५९४५६७), प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर इमारत दुरुस्तीच्या कामासाठी संदर्भाधीन क्र. ६ अन्वये निधी उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीत तरतुदींतून मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशिर्ष २०५९-सार्वजनिक बांधकामे याखाली कार्यालयीन इमारतींची

देखभाल दुरुस्ती या योजनेंतर्गत आदिवासी विकास भवन, गडकरी चौक, नाशिक या इमारतीच्या दुरुस्तीकरिता आणि आदिवासी विकास भवन, गडकरी चौक, नाशिक येथे कार्यरत सह आयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र क्र. १ नाशिक कार्यालयाच्या इमारत दुरुस्तीकरिता तसेच सदर कार्यालयातील पोलीस पथक कार्यालय इमारतीचे दुरुस्तीच्या कामासाठी खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| **योजनेचे नाव** | **लेखाशिर्ष** | **उद्दिष्ट** | **सन २०२४-२५ साठी मंजूर सुधारीत अंदाज** | **यापूर्वी वितरीत निधी** | **या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी** | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | **कामाचे नाव** | **वितरीत निधी** |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| कार्यालयीन इमारतींची देखभाल दुरुस्ती | २०५९ ४५६७ | २७, लहान बांधकामे | २१०००.०० | १०८.४० | सह आयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र क्र. १ नाशिक या कार्यालयाची इमारत दुरुस्ती करणे | २५.०० |
| | | | | | सह आयक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र क्र. १ नाशिक या कार्यालयातील पोलीस दक्षता पथक कार्यालयाची इमारत दुरुस्ती करणे | ८.०० |
| | | | | | आदिवासी विकास भवन, गडकरी चौक, नाशिक या इमारतीची दुरुस्ती करणे | १३५.०० |
| | **एकूण** | | | | | **१६८.००** |

उपरोक्तप्रमाणे **रु.१६८.०० लाख (अक्षरी रुपये एक कोटी अडुसष्ट लाख फक्त) इतका निधी संबधित नियंत्रक अधिकारी तथा अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ, नाशिक** यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण (BEAMS) वितरीत व खर्च करण्यास मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. वितरीत निधी आदिवासी विकास भवन, गडकरी चौक, नाशिक या इमारतीच्या दुरुस्तीकरिता आणि आदिवासी विकास

भवन, गडकरी चौक, नाशिक येथे कार्यरत सह आयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र क्र. १ नाशिक कार्यालयाच्या इमारत दुरुस्तीकरिता तसेच सदर कार्यालयातील पोलीस पथक कार्यालय इमारतीचे दुरुस्तीच्या कामासाठी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ व २ च्या शासन परिपत्रकातील व सं.क्र.४ व ५ येथील शासन ज्ञापनातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ ई-ऑफिस क्र.८०४१८१ वर पृ. ३४-३९/ टि.वि. वरील दि.२७.०३.२०२५ रोजीच्या मान्यतेस अनुसरुन व संदर्भाधीन क्र.१ व २ येथील शासन परिपत्रकांन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२९२००५०२३०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2025.03.29 23:13:36 +05'30'

**( राजेंद्र दे. भवारी )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव, आदिवासी विकास यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ, नाशिक.
६. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.

८. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.

९. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

१०. कार्यासन क्र. ५, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

११. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.